**महाराष्ट्र शासन**

क्रमांकः  संकीर्ण १०१८/प्र.क्र.१२२/१४-ब

सामान्य प्रशासन विभाग
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १८ ऑक्टोबर, २०१९

प्रति,
**सहसचिव/उपसचिव (आस्थापना)**
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**विषय : मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०६.०८.२०१८ रोजी रिट याचिका क्र. २९८६/२०००, २९८२/२०००, ४९५८/२००३ आणि ३३७४/२०११ वर दिलेल्या आदेशास अनुसरुन, सन १९८६ पासूनच्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, अवर सचिव, उपसचिव, सहसचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्याकरिता गठीत गटात काम करण्याकरिता अधिकाऱ्यांची इच्छुकता मागविण्याबाबत.**

मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०६.०८.२०१८ रोजी रिट याचिका क्र. २९८६/२०००, २९८२/२०००, ४९५८/२००३ आणि ३३७४/२०११ एकत्रितरित्या निकाली काढल्या आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरुन सन १९८६ पासूनच्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, अवर सचिव, उपसचिव, सहसचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्यासाठी शासन आदेश, दि.१२.१०.२०१८ अन्वये अवर सचिव, सा.प्र.वि/कार्यासन १४ यांच्या पर्यवेक्षीय नियंत्रणाखाली एक गट स्थापन करण्यात आला आहे. सदर गटात ०३ अधिकारी/कर्मचारी सध्या कार्यरत असून त्यांच्या सेवा अधिग्रहणाचा कालावधी दिनांक ३१.१२.२०१९ पर्यंत आहे. या गटाकडून तयार करण्यात आलेल्या सन १९८६ ते २००४ या कालावधीतील संबंधित तात्पुरत्या ज्येष्ठतासूच्या/निवडसूच्या हरकती व सूचना मागविण्यासाठी प्रसिध्द करण्यात आल्या असून, पुढील कार्यवाही विचाराधीन आहे.

२.	मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरुन प्रसिध्द करण्यात आलेल्या/येणाऱ्या ज्येष्ठतासूच्या / निवडसूच्यांवर कार्यवाही करण्यासाठी त्याचप्रमाणे या अनुषंगाने प्राप्त झालेल्या / होणाऱ्या हरकती व सूचनांवर कार्यवाही करण्यासाठी संबंधित गटास अधिकचे मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. **"याकरिता मंत्रालयीन विभागातील अवर सचिव-१, कक्ष अधिकारी-१ व सहायक कक्ष अधिकारी-२ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरुपात अधिग्रहित करावयाच्या आहेत."** सदर बाब आपणाकडून विभागातील अवर सचिव/कक्ष अधिकारी/सहायक कक्ष अधिकारी यांच्या निदर्शनास आणून देण्यात यावी.

३.	त्यानुसार विभागातील अवर सचिव, कक्ष अधिकारी तसेच सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील इच्छुक अधिकाऱ्यांनी यासाठी दर्शविलेली इच्छुकता आपण सा.प्र.वि./कार्यासन १४-ब ला **दिनांक ३१.१०.२०१९ पर्यंत** कळवावी. तसेच विभागातील संबंधित अधिकाऱ्यांनी इच्छुकता दर्शविली नसल्यास तसेही या विभागास कळवावे, ही विनंती.

सदर पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९१०१८१६३५०३२६०७ असा आहे.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.10.18 16:37:25 +05'30'

**( ग. भि. गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
कार्यासन १४-ब संग्रहार्थ.